# अनुक्रमणिका

# संपादकीय

नमस्कार मंडळी,

प्रथे प्रमाणे मे महिन्याचा बहर तुमच्या हातात देतांना नवीन कमिटीच्या बहर टीम ला विशेष आनंद होत आहे.

सर्वप्रथम मी नवीन कमिटी २०१५-१६ तील सर्वांचे मनपूर्वक अभिनंदन करून शुभेच्छा व्यक्त करतो.

दुसऱ्यांदा अध्यक्ष झालेले श्री चारुदत्त सावंत आणि सेक्रेटरी सौ. शीतल अंबुरे यांच्या मार्गदर्शनाखाली नवीन कमिटी अबूधाबीतील समस्त मराठी बंधु आणि भगिनींच्या अपेक्षा पूर्ण करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करतील असा मी आपणास विश्वास देऊ इच्छितो.

सगळ्या कमिटी मेंबरर्स् ची माहिती वेब साईटवर उपलब्ध असून ह्या मासिकातही तुम्हाला वाचायला मिळेल.

मी ह्या आधीच्या बहर मासिकाच्या टीमचे त्यांच्या सहकार्याबद्दल तसेच मार्गदर्शनाबद्दल आभार मानतो.

बहर मासिक लहानांपासून थोरांपर्यंत आवडीचे व्हावे तसेच माहितीपूर्ण आणि वाचनीय व्हावे यासाठी आम्ही त्याची विभागवार रचना करत असून काही लेखमाला, क्रमशः गोष्टी, मे अथवा जून महिन्यापासून सुरु करत आहोत. तपशीलवार माहिती पुढे अंकात तुम्हाला मिळेलच.

आमच्या बहर टीमने व्याकरणातील, जोडाक्षरातील चुका टाळण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला आहे. तरीही काही चुका राहून गेल्या असल्यास त्यांना अक्षम्य न मानता क्षमा करावी ही नम्र विनंती.

आपला नम्र

श्री. देवेंद्र सदाशिव भागवत - संपादक - ०५०४३७१८४४९ - devendrabhagwat@yahoo.com

# ओळख कमिटी - २०१५ -१६ ची



**श्री चारुदत्त  सावंत**

**मोबाइल: 0504133059, ईमेल: s_charudatta@yahoo.com**

**श्री चारुदत्त सावंत, महाराष्ट्र मंडळ अबुधाबी चे माननिय अध्यक्ष आहेत, ते एक अभियांत्रिकी पदविकाधारक आहेत आणि पारसन इंटरनॅशनल लिमिटेड या कंपनी मध्ये सिविल डिझायनर म्हणून काम करत आहेत. अनेक वर्षे महाराष्ट्र  मंडळ  अबुधाबी  कुटुंबाचा भाग आहेत आणि अतिशय सक्रिय आहेत आणि प्रत्येक कार्यक्रमात सहभागी असतात.**



**सौ शीतल अंबुरे**

**मोबाइल: 0553198041, ईमेल: amburesan@gmail.com**

**महाराष्ट्र  मंडळ  अबुधाबी मध्ये सचिव म्हणून कार्यरत आहेत. त्या एक विज्ञान पदवीधर आहेत आणि व्यवसाय वव्यस्थपन मध्ये पदवी आहेत. सद्ध्या अल मुना प्राथमिक शाळात  कार्यरत आहेत . त्यांनी  महाराष्ट्र  मंडळ  अबुधाबी मध्ये बहर संपादक म्हणून आधी काम केले आहे त्या खूप सक्रिय आणि  नवीन आव्हाने स्वीकारत आहेत तसेच व्यवस्थापन आयोजन केले होते.**



**सौ प्राजक्ता गोखले**

**मोबाइल: 0554123696, ईमेल: prajaktagokhale@yahoo.com**

**महाराष्ट्र  मंडळ  अबुधाबी मध्ये खजिनदार म्हणून कार्यरत आहेत. प्राजक्ता, एमबीए वित्त आहेत. त्या एक संगीत विशारद आणि व्यावसायिक गायक आहेत.**



**श्री देवेंद्र भागवत**

**मोबाइल: 0504371849, ईमेल: devendrabhagwat@yahoo.com**

**देवेंद्र भागवत महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये बहर संपादक म्हणून कार्यरत आहेत, ते या कंपनी मध्ये सिनीअर इंजिनिअर म्हणून काम आहेत. ते सामाजिक कार्यात सक्रिय असून आधारवड ट्रस्ट याचे संस्थापक आणि विश्वस्त आहेत हि संस्था निराधार आणि अपंग महिलासाठी काम करते.**



**श्री संदेश चौधरी**

**मोबाइल: - 00971-508820150, ईमेल:sandeshchaudhari@gmail.com**

**संदेश महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये बहर सहसंपादक म्हणून कार्यरत आहेत. संदेश बी-टेक पेट्रोकेमिकल अभियंता आहेत. ते एलिक्षिएर (अद्नोक लिंडे औद्योगिक वायू कंपनी लि.), या मध्ये उत्पादन व्यवस्थापक म्हणून कार्यरत आहेत.**



**श्री हेमंत पाटील**

**मोबाइल: 0506680964, ईमेल: hemant2813@gmail.com**

**हेमंत महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये बहर सहसंपादक म्हणून कार्यरत आहेत. ते एका इलेक्ट्रोनिक्स कंपनी (ओइल आणि गेस ) तांत्रिकी व्यवस्थापक म्हणून कार्यरत आहेत.**



**सौ अमृता देवधर**

**मोबाइल : 00971-563063434, ई-मेल: deodhar.amruta@yahoo.com**

**अमृता एक अभियांत्रिकी पदवीधर आहे, महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये जनसंपर्क अधिकारी आणि आय ठी विकसित म्हणून कार्यरत आहेत. त्या एका जर्मन बहुराष्ट्रीय कंपनी मध्ये आर & डी विभाग मध्ये विकसक म्हणून काम करत आहेत.**



**सौ सारिका कोरिया**

**मोबाइल: 0551643541, ईमेल: sarika_darekar@yahoo.com**

**सारिका महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये जनसंपर्क सहाय्यक म्हणून कार्यरत आहेत. त्या एक विद्युत अभियंता आहेत.**



**डॉ सारिका जायखेडकर**

**मोबाइल - + 971 553793137, ई मैल - dr.sarikaj@gmail.com**

**डॉ सारिका जैखेडकर महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये जनसंपर्क सहाय्यक म्हणून कार्यरत आहेत. त्या एक होमो पथिक वैद्य आहेत आणि गल्फ निदान केंद्र आणि रुग्णालय मध्ये वैद्यकीय विमा आणि कोडींग अधिकारी म्हणून काम करत आहेत.**



**श्री अमित होशिंग**

**मोबाइल: 00971-566158161, ई-मेल: amit.hoshing@yahoo.com**

**अमित महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये क्रीडा, प्रायोजकत्व आणि लोगीस्तिक आयोजक म्हणून कार्यरत आहेत. यांनी व्यवसाय वव्यस्थपन मध्ये पदवी घेतली आहे, आणि सध्या एका नामांकित बहुराष्ट्रीय कंपनी मध्ये वित्त नियंत्रक म्हणून काम करत आहेत.**



**श्री चिनार पाटील**

**मोबाइल: 0503765842, ईमेल: chinar_patil@yahoo.in**

**चिनार महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये ग्राफिक चे काम बघणार आहेत,चिनार वाणिज्य पदवीधर आहेत. ते एका नामांकित आग आणि सुरक्षितता कंपनी मध्ये संकलन अधिकारी चे काम करत आहेत.**



**श्री जयंत पवार**

**मोबाइल: 0508346075, ईमेल: pwrjay@gmail.com**

**जयंत महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये प्रायोजकत्व आणि इव्हेंट आयोजक म्हणून कार्यरत आहेत. ते एक अभियंता आहेत आणि एका सुप्रसिद्ध औषध कंपनी मध्ये व्यवस्थापक म्हणून काम करत आहेत.**



**सौ मानसी कोरिया**

**मोबाइल: 0566693137, ईमेल: manasi_correa@rediffmail.com**

**मानसी महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये प्रायोजकत्व आणि इव्हेंट आयोजक म्हणून कार्यरत आहेत. त्यानि सिम्बायोसिस पुणे इथून पदवी घेतली आहे आणि त्या नेक्सास कंपनी मध्ये पोर्टफोलिओ व्यवस्थापक म्हणून काम करत आहेत.**



**श्री राजेंद्र वाघ**

**मोबाइल: 0504274570, ईमेल: wagh2020@gmail.com**

**राजेंद्र महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये मालमत्ता हाताळणी चे काम बघत आहेत, ते पाल तंत्रज्ञान (रीम बेठ) या कंपनी मध्ये सुपरवायझर म्हणून काम करत आहेत.**



**श्री अजय करंजावणे**

**मोबाइल: 0504508829, ईमेल: ajaykaranjawane@gmail.com**

**अजय महाराष्ट्र मंडळ अबुधाबी मध्ये मालमत्ता हाताळणी चे काम बघत आहेत, त्यांनी मुंबई विद्यापीठातून बी टेक केले आहे आणि गल्फ बायो कंपनी मध्ये वरिष्ठ अभियंता म्हणून काम करत आहेत.**

# मुखचित्राची ओळख : हुतात्मा चौकाचा इतिहास



इ.स.१९५६ च्या नोव्हेंबरातील २१ तारखेची ती संध्याकाळ होती. सकाळपासून फ्लोरा फाउंटनच्या परिसरात तणावाचे वातावरण होते. राज्य पुनर्रचना आयोगाने महाराष्ट्राला मुंबई देण्याचे नाकारले होते. मराठी बाण्याची मुंबई या अन्यायाने खवळून उठली होती. सर्वत्र छोट्यामोठ्या सभांमधून त्याचा जळजळीत निषेध होत होता. याचा संघटित परिणाम म्हणून कामगार आणि पांढरपेशांचा एक विशाल मोर्चा, तेव्हाच्या विवेकशून्य सरकारचा निषेध करण्यासाठी फ्लोरा फाऊंटनसमोरील चौकात येणार होता. दुपार टळल्यानंतर, म्हणजे मुंबईतल्या शंभर-सव्वाशे कापडगिरण्यांमधील, कामगारांची चारची पहिली पाळी संपल्यानंतर गिरणगावातून मोर्चा निघेल, असा अंदाज होता. पण त्याला छेद देत पांढरपेशांचा प्रचंड जनसमुदाय, एका बाजूने चर्चगेट स्थानकाकडून व दुसऱ्या बाजूने बोरीबंदरकडून गगनभेदी घोषणा देत, फ्लोरा फाउंटनकडे जमू लागला. हा मोर्चा पोलिसी ताकद वापरून उधळला जाईल, असा अंदाज होताच. कारण फोर्ट भागात जमाव आणि सभाबंदी जारी केली होती. सर्व कार्यालयांतील महिला कर्मचाऱ्यांना घरी पाठविले होते. जमावबंदीचा भंग करून, मुंबईकर फ्लोरा फाउंटनाच्या चौकात सत्याग्रहासाठी ठाण मांडून बसले होते. त्यानंतर थोड्या वेळातच विपरीत घडले. सत्याग्रहींना उधळून लावण्यासाठी लाठीमार करण्यात आला. मात्र, तरीही ते चौकातून हटत नाहीत म्हटल्यावर पोलिसांना गोळीबाराचा आदेश देण्यात आला. मुंबई राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री मोरारजी

देसाई  यांनी "दिसताक्षणी गोळ्या" घालण्याचे पोलिसांना आदेश होते. प्रेक्षणीय फ्लोरा फाउंटनच्या कारंज्यातील पाण्यासारख्याच शांततापूर्ण आंदोलन करणाऱ्या निदर्शकांच्या रक्ताच्या चिळकांड्या काळ्याभोर रस्त्यावर उडू लागल्या. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात जानेवारी, इ.स. १९५७ पर्यंत जे १०५ आंदोलक हुतात्मे झाले, त्या मालिकेची ही सुरुवात होती.

**या सर्व हुतात्म्यांच्या बलिदानापुढे व मराठी माणसाच्या आंदोलनामुळे काँग्रेसी सरकारला नमते घेऊन १ मे, इ.स. १९६० रोजी मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची स्थापना करावी लागली. त्यानंतर इ.स. १९६५मध्ये त्या जागी हुतात्मा स्मारकाची उभारणी झाली.**

# वाचकांशी संवाद आणि आवाहन

प्रिय वाचकहो नमस्कार

ह्या आधी सांगितल्या प्रमाणे बहर मासिक लहानांपासून थोरांपर्यंत आवडीचे व्हावे तसेच माहितीपूर्ण आणि वाचनीय व्हावे यासाठी आम्ही काही बदल करत आहोत. मासिकाची विभागवार रचना हा त्यातील एक भाग. यातील विभाग खालील प्रमाणे

**प्रमुख विभाग**

**बाल विभाग (बालपण):** ह्यात विक्रम वेताळाची क्रमशः गोष्ट असेल. लहान मुलांना रंगवायला दोन चित्र दिली जातील. मुलांनी लिहिलेल्या गोष्टी आणि कविता तसेच मुलांनी काढलेली चित्रे छापली जातील. आपणास आवाहन केले जाते कि कृपया हिरीरीने मुलांना ह्यात भाग घ्यायला प्रोत्साहीत करावे.

**स्त्री विभाग (सखी):** स्त्रियांच्या आरोग्य संबंधी टिपा, स्वैपाकासंबंधात लेख, शंका निरसन, उखाणे इ. असतील.साहित्य विभाग

**साहित्य विभाग (खरे सोबती) :** ह्या विभागात वाचलेल्या अगर ऐकलेल्या चांगल्या जुन्या, नवीन पुस्तकांबद्दल माहिती दिली जाईल. मंडळाचे नियमित लेखक श्री मंदार आपटे तसेच सौ. हेमांगी गिरिधर ह्यांच्या लेखमाला यात दिल्या जातील.

**आरोग्य विभाग :** विविध रोग, त्यावरील उपाय, तब्येतीची काळजी कशी घ्यावी, संतुलित आहार या विषयीचे डॉ. सौ पल्लवी बारटके, डॉ. सौ सारिका जायखेडकर, डॉ. सौ प्रज्ञा घैसास-जोशी, डॉ. सौ गौरी कुलकर्णी ह्यांनी लिहिलेले लेख ह्यात प्रसिद्ध होतील.

**अर्थ विभाग :** श्री अनिल पाकळे - हे नवख्या परंतु शेअर मार्केट बद्दल जिज्ञासा असलेल्या साठी शेअर मार्केटची बाराखडी हि लेखमाला तर शेअर मार्केटशी परिचित असलेल्या आणि नियमित व्यवहार करत असलेल्यांसाठी देखील शेअर मार्केट- अभ्यासपूर्ण विश्लेषण हि लेखमाला लिहित आहेत. त्यांच्या या सहकार्य बद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत

**लेख माला :** बहरच्या  विनंतीला मान देवून लेखमाला लिहायला होकार दिल्याबद्दल मी श्री नरेंद्र कुलकर्णी  - विज्ञान आधारित आध्यात्म, अजय पडवळ - छायाचित्रण एक कला , सौ. हेमांगी गिरिधर, श्री प्रशांत कुलकर्णी आणि श्री राजन तावडे, ह्यांचा अतिशय आभारी आहे.

**इतर विभाग :**

**वाढदिवस / लग्नाचे वाढदिवस :** आपल्या छकुलीचा किंवा छकुल्याचा  वाढदिवस, आपल्यावर प्रेम करणाऱ्या जवळच्या प्रेमळ व्यक्तीचा वाढदिवस, अगदी लग्नाचा वाढदिवस फोटोसह आणि तुमच्या शुभेच्छांसह आम्हाला कळवा. आम्ही त्या प्रसिद्ध करू.

**यंदा कर्तव्य आहे :** स्वप्नातील साथीदार मिळावा असे कोणाला वाटत नाही? जरी जन्म-जन्मांतरीचा गाठी स्वर्गात बांधल्या जात असतील तरी पृथ्वीवर धागे-दोरे जुळवायला काय हरकत आहे. तुमच्याकडे उपवर वधु-वर असतील तर आम्हाला जरूर माहिती पाठवा आम्ही ती जरूर छापु.

मात्र त्यासाठी फी भरावी लागेल. तसेच नोंद ठेवावी लागेल की महाराष्ट्र मंडळाने मिळालेली माहिती जशीचातशी छापलेली असेल आणि त्याच्या खरे-खोटे पणाबद्दल जबाबदार असणार नाही. तसेच महाराष्ट्र मंडळ कुठेही मध्यस्थाचे काम करत नाही

आणि करणार नाही. स्वारस्य असेलेल्या लोकांनी आपल्या जबाबदारीवर उमेदवारांशी संपर्क साधावा आणि माहितीचा खरेखोटेपणा तपासावा.

**<u>अनुभव विश्व :</u>** प्रत्येकाला आपापल्या आयुष्यात काही ना काही भले बुरे अनुभव येतच असतात. ते अनुभव आपल्याला बरेच काही शिकवून जातात किंवा तजेलदार आठवणी ठेवून जातात. जर आपल्याला हे अनुभव किंवा आठवणी शब्दबद्ध करायला अडचण येत असेल तर ह्या सदराअंतर्गत वाचकांना आवाहन करण्यात येते कि आम्हाला खाली दिलेल्या मोबाईलवर संपर्क करावा आम्ही तुमचे अनुभव शब्दबद्ध करू.

**<u>वाचकांची पत्रे :</u>** केलेल्या मेहनतीचे .कौतुक व्हावे असे कोणाला वाटत नाही. आमच्या लेखकांचा / कवींचा, बहर टीमचा हुरूप वाढवा यासाठी आम्हाला आपल्या प्रतिक्रिया जरूर कळवाव्यात. अगदी न आवडलेल्या, सुधारणेची गरज असल्यास तश्या सूचनाही कराव्यात. आम्ही तुमच्या सूचना जरूर पाळण्याचा प्रयत्न करू.

शेवटी सगळ्यात महत्वाचे :

लेख कसा लिहाल? आणि बहर टीमला कसा पाठवाल ?

मराठी टायपिंग येत नसेल तरी हरकत नाही. फक्त खालील स्टेप्स पाळाव्यात

1. पुढील लिंकवर क्लिक करा. http://marathi.changathi.com/



2. मनातील मराठी वाक्य इंग्रजीत टाईप करा उदा. “मला भूक लागली” हे वाक्य "malaa bhuk lagali” असे टाईप करा, प्रत्येक शब्दानंतर स्पेस बार दाबा, म्हणजे प्रत्येक इंग्रजी शब्द मराठीत बदलत जाईल.
3. भाषांतरील झालेले मराठी वाक्य कॉपी करा आणि word file मध्ये paste करा.
4. संपूर्ण परीच्छेदही अथवा लेखही copy-paste करता येवू शकतो.
5. अशाप्रकारे मराठी टाईप केलेली native word file आम्हाला पाठवा.
6. आम्ही त्यात योग्य व्याकरणात्मक  दुरुस्ती करून छापू.
7. हवे असल्यास लेखाबरोबर तुमचा पासपोर्ट साईझ फोटो तसेच परिचयात्मक चार वाक्य, मोबाइल नंबर आणि इमेल आय डी पाठवणे.
8. काही शंका अथवा अडचण आल्यास खालील बहर टीमशी संपर्क करावा.

आपले नम्र

श्री. देवेंद्र सदाशिव भागवत-संपादक-०५०४३७१८४४९-
devendrabhagwat@yahoo.com

श्री हेमंत पाटील -उपसंपादक - ०५०६६८०९६४ - hemant2813@gmail.com

श्री संदेश चौधरी -उपसंपादक -०५०८८२०१५० - sandeshchaudhari@gmail.com

# किल्ले रायगड



किल्ले रायगड हा महाराष्ट्रातील रायगड जिल्ह्यातील सह्याद्रीच्या पर्वतरांगांत असून समुद्रसपाटीपासून सुमारे ८२० मीटर (२७०० फूट) उंचीवर आहे. मराठी साम्राज्याच्या इतिहासामध्ये त्याची एक खास ओळख आहे. छत्रपती शिवाजीराजांनी रायगडचे स्थान आणि महत्त्व पाहून १७ व्या शतकात याला आपल्या राज्याची राजधानी बनविली. शिवराज्याभिषेक याच ठिकाणी झाला. गडावर पोहोचायला जवळ-जवळ १४००-१४५० पायऱ्या आहेत. इंग्रजांनी गड कब्जात घेतल्यानंतर लुटून त्याची नासधूस केली.

रायगडाचे प्राचीन नाव 'रायरी' हे होते. युरोपचे लोक त्यास 'पूर्वेकडील जिब्राल्टर' असे म्हणत असत. जिब्राल्टरचे ठाणे जितके अजिंक्य तितकाच रायगड अजिंक्य व दुर्गम. पाचशे वर्षांपूर्वी त्यास गडाचे स्वरूप नव्हते व तो नुसता एक डोंगर होता, तेव्हा त्यास 'रासिवटा' व 'तणस' अशी दोन नावे होती. त्याचा आकार, उंची व सभोवतालच्या दऱ्या यावरून त्यास 'नंदादीप' असेही नाव पडले. निजामशाहीत रायगडाचा उपयोग कैदी ठेवण्यापुरता होई. मोऱ्यांचा प्रमुख यशवंतराव

मोरे जावळीहून पळून रायगडावर जाऊन राहिला तर प्रतापराव मोरे विजापुरास पळाला. महाराजांनी ६ एप्रिल १६५६ रोजी रायरीस म्हणजेच रायगडास वेढा घातला व मे महिन्यात रायरी महाराजांच्या ताब्यात आली. तेथे असताना, कल्याणचा सुभेदार मुल्ला अहमद खजिना घेऊन विजापूरकडे निघाल्याची बातमी महाराजांना समजली. त्यांनी तो खजिना लुटून रायगडावर आणला व त्या खजिन्याचा उपयोग गडाच्या बांधकामासाठी केला. रायगडाचा माथा राजधानी बनवण्यास सोयीचा व पुरेसा आहे. शत्रूला अवघड वाटणाऱ्या प्रदेशातले ते अधिक अवघड ठिकाण आहे. सागरी दळणवळणासही हे ठिकाण जवळ आहे. म्हणून महाराजांनी राजधानीसाठी या गडाची निवड केली.

गडावरील पहाण्यासारखी ठिकाणे

१. पाचाडचा जिजाबाईंचा वाडा : उतारवयात जिजाबाईंना गडावरची थंड हवा, वारा मानवत नसे, म्हणून महाराजांनी त्यांच्यासाठी पाचाडजवळच एक वाडा बांधून दिला. तोच हा मासाहेबांचा राहता वाडा. वाडाची व्यवस्था ठेवण्यासाठी काही अधिकारी तसेच शिपायांची व्यवस्थाही महाराजांनी केली होती. पायऱ्यांची एक उत्तम विहीर, तसेच जिजाबाईंना बसण्यासाठी केलेले दगडी आसन बघण्यासारखे आहे. यास 'तक्क्याची विहीर' असेही म्हणतात.

२. खुबलढा बुरूज : गड चढू लागले म्हणजे एक बुरुजाचे ठिकाण दिसते, तोच हा सुप्रसिद्ध खुबलढा बुरूज. बुरुजाशेजारी एक दरवाजा होता, त्यास 'चित् दरवाजा' म्हणत पण हा दरवाजा आता पूर्णपणे उध्वस्त झाला आहे.

३. नाना दरवाजा : या दरवाजास 'नाणे दरवाजा' असेही म्हणत. या दरवाजाचा संबंध नाना फडणिसांशी लावला जातो अशी गैरसमजूत आहे. नाना दरवाजा याचाच अर्थ लहान दरवाजा. इ.स. १६७४ च्या मे महिन्यात राज्याभिषेकाच्या निमित्ताने

इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्झेंडन याच दरवाजाने आला होता. या दरवाज्यास दोन कमानी आहेत. दरवाज्याच्या आतील बाजूस पहारेकऱ्यांसाठी दोन लहान खोल्या आहेत. त्यांस 'देवडा' म्हणतात. दरवाजास अडसर घालण्यासाठी खोबणी दिसतात.

४. मदारमोर्चा किंवा मशीदमोर्चा : चित् दरवाज्याने गेल्यावर नागमोडी वळणे घेत गेलेल्या रस्त्याने पुढे गेल्यावर एक सपाटी लागते. या मोकळ्या जागेत टोकाशी दोन पडक्या इमारती दिसतात. त्यापैकी एक पहारेकऱ्यांची जागा असून दुसरे धान्याचे कोठार आहे. येथे मदनशहा नावाच्या साधूचे थडगे आहे. तेथे एक प्रचंड तोफही दिसते. येथून पुढे गेल्यावर खडकात खोदलेल्या तीन गुहा दिसतात.

५. महादरवाजा : महादरवाज्याच्या बाहेरील अंगास वर दोन्ही बाजूस दोन सुंदर कमळाकृती कोरल्या आहेत. दरवाज्यावर असणाऱ्या या दोन कमळांचा अर्थ म्हणजे किल्ल्याच्या आत 'श्री आणि सरस्वती' नांदत आहे. 'श्री आणि सरस्वती' म्हणजेच 'विद्या व लक्ष्मी' होय. महादरवाज्याला दोन भव्य बुरूज असून एक ७५ फूट तर दुसरा ६५ फूट उंच आहे. तटबंदीमध्ये जी उतरती भोके ठेवलेली असतात त्यास 'जंग्या' म्हणतात. शत्रूवर मारा करण्यासाठी ही भोके ठेवलेली असतात. बुरुजांमधील दरवाजा हा वायव्य दिशेस तोंड करून उभा आहे. महादरवाज्यातून आत आल्यावर पहारेकऱ्यांच्या देवडा दिसतात तसेच संरक्षकांसाठी केलेल्या राहण्याच्या खोल्या दिसतात. महादरवाज्यापासून उजवीकडे टकमक टोकापर्यंत तर डावीकडे हिरकणी टोकापर्यंत तटबंदी बांधलेली आहे.

६. चोरदिंडी : महादरवाज्यापासून उजवीकडे टकमक टोकापर्यंत जी तटबंदी जाते, त्यावरून चालत गेल्यास जिथे ही तटबंदी संपते, त्याच्या थोडे अलीकडे बुरुजात ही चोरदिंडी बांधलेली आहे. बुरुजाच्या आतून दरवाजापर्यंत येण्यासाठी पायऱ्या आहेत.

७. हत्ती तलाव : महादरवाज्यातून थोडे पुढे आल्यावर जो तलाव दिसतो तो हत्ती तलाव. गजशाळेतून येणाऱ्या हत्तींच्या स्नानासाठी आणि पिण्यासाठी या तलावाचा उपयोग होत होता.

८. गंगासागर तलाव : हत्तीतलावापासून जवळच रायगड जिल्हा परिषदेच्या धर्मशाळेच्या इमारती दिसतात. धर्मशाळेपासून दक्षिणेकडे अंदाजे ५० -६० पावले चालत गेल्यास जो तलाव लागतो तो गंगासागर तलाव. महाराज्यांच्या राज्याभिषेकानंतर सप्तसागर व महानांची आणलेली तीर्थेयाच तलावात टाकली गेली. म्हणूनच याचे गंगीसागर असे नाव पडले. शिवकाळात शिबंदीसाठी याचे पाणी वापरण्यात येई.

९. स्तंभ : गंगासागराच्या दक्षिणेस दोन उंच मनोरे दिसतात. त्यासच स्तंभ म्हणतात. जगदीश्र्वराच्या शिलालेखामध्ये ज्या स्तंभांचा उल्लेख केला आहे, ते हेच असावेत. ते पूर्वी पाच मजले होते असे म्हणतात. ते द्वादश कोनी असून बांधकामात नक्षीकाम आढळते.

१०. पालखी दरवाजा : स्तंभांच्या पश्चिमेस भिंत असलेल्या भागातून ३१ पायऱ्या बांधलेल्या दिसतात. त्या चढून गेल्यावर जो दरवाजा लागतो तो पालखी दरवाजा. या दरवाज्यातून आपल्याला बालेकिल्ल्यात प्रवेश करता येतो.

११. मेणा दरवाजा : पालखी दरवाज्याने वर प्रवेश केला की, चढ - उतार असलेला एक सरळ मार्ग आपल्याला मेणा दरवाजापर्यंत घेऊन जातो. उजव्या हातास जे सात अवशेष दिसतात ते आहेत राण्यांचे महाल. मेणा दरवाज्यातून बालेकिल्ल्यावर प्रवेश करता येतो.

१२. राजभवन : राणीवशाच्या समोर डाव्या हातास दासदासींच्या मकानांचे अवशेष दिसतात. या अवशेषांच्या मागे दुसरी जी समांतर भिंत आहे त्या भिंतीच्या

मध्यभागी जो दरवाजा आहे तेथून बालेकिल्ल्याच्या अंतर्भागात प्रवेश केला की जो प्रशस्त चौथरा लागतो तेच हे महाराजांचे राजभवन. राजभवनाचा चौथारा ८६ फूट लांब व ३३ फूट रुंद आहे. १३. रत्नशाळा : राजप्रासादाजवळील स्तंभांच्या पूर्वेकडे असलेल्या मोकळ्या जागेत एक तळघर आहे, तीच ही रत्नशाळा. हा खलबतखाना म्हणजेच गुप्त बोलणी करण्यासाठी केलेली खोली असावी असेही म्हणतात.

१४. राजसभा : महाराजांचा राज्याभिषेक जेथे झाला, तीच ही राजसभा. राजसभा २२० फूट लांब व १२४ फूट रुंद आहे. येथेच पूर्वेकडे तोंड केलेली सिंहासनाची जागा आहे. येथे बत्तीस मणांचे सोन्याचे सिंहासन होते. सभासद बखर म्हणते, 'तख्त सुवर्णाचे बत्तीस मणांचे सिद्ध करवले. नवरत्ने अमोलिक जितकी कोशात होती, त्यामध्ये शोध करून मोठी मोलाची रत्ने जडाव केली.'

१५. नगारखाना : सिंहासनाच्या समोर जे भव्य प्रवेशद्वार दिसते तोच हा नगारखाना. हे बालेकिल्ल्याचे मुख्य प्रवेशद्वार आहे. नगारखान्यातून पायऱ्या चढून वर गेले की आपण किल्ल्यावरील सर्वाधिक उंचीवर असतो.

१६. बाजारपेठ : नगारखान्याकडून आपण डावीकडे उतरुन आलो की, समोर जी मोकळी जागा दिसते तो 'होळीचा माळ'. तेथेच आता शिवछत्रपतींचा भव्य पुतळा बसवलेला आहे. पुतळ्यासमोर जे दोन रांगांमध्ये भव्य अवशेष दिसतात तीच शिवकाळातील बाजारपेठ. पेठेच्या दोन रांगात प्रत्येकी २२ दुकाने आहेत. मधून जवळजवळ चाळीस फूट रुंद रस्ता आहे.

१७. शिर्काई देऊळ : महाराजांच्या पुतळ्याच्या डाव्या बाजूस जे छोटे देऊळ दिसते ते शिर्काईचे देऊळ. शिर्काई ही गडावरील मुख्य देवता. शिर्के पाचव्या शतकापासून रायगडाचे स्वामी होते. याची आठवण देणारी गड्स्वमिनी श्री शिरकाई मंदिर गडावर आहे. लोकमान्य टिळकांच्या काळात मावळंकर नावाच्या इंजिनिअर ने हे मंदिर

बांधले आहे. ते श्री शिरकाई चे मूळ मंदिर नाही. मूर्ती मात्र प्राचीन आहे. मूळ शिरकाई मंदिर राजवाड्यास लागून डावीकडे होळी माळावर होते. तेथे मूळ देवळाचा चबुतरा अजूनही आहे. ब्रिटीश काळापासून तेथे श्री शिरकाई चा घरटा हा नामफलक होता.

१८. जगदीश्र्वर मंदिर : बाजारपेठेच्या खालच्या बाजूस पूर्वेकडील उतारावर ब्राह्मणवस्ती, ब्राह्मणतळे वगैरे अवशेष दिसतात. तेथूनच समोर जे भव्य मंदिर दिसते तेच महादेवाचे म्हणजे जगदीश्र्वराचे मंदिर. मंदिरासमोर नंदीची भव्य आणि सुबक मूर्ती आहे. पण सध्या ही मूर्ती भग्नावस्थेत आहे. मंदिरात प्रवेश केला की भव्य सभामंडप लागतो. मंडपाच्या मध्यभागी भव्य कासव आहे. गाभाऱ्याच्या भिंतीस हनुमंताची भव्य मूर्ती दिसते. मंदिराच्या प्रवेशद्‌वाराच्या पायऱ्यांच्या खाली एक लहानसा शिलालेख दिसतो. तो पुढीलप्रमाणे, 'सेवेचे ठायी तत्पर हिरोजी इटळकर' या दरवाजाच्या उजव्या बाजूस भिंतीवर एक सुंदर शिलालेख दिसतो तो पुढीलप्रमाणे - श्री गणपतये नमः। प्रासादो जगदीश्र्वरस्य जगतामानंददोनुज्ञया श्रीमच्छत्रपतेः शिवस्यनृपतेः सिंहासने तिष्ठतः। शाके षण्णवबाणभूमिगणनादानन्दसंवत्सरे ज्योतीराजमुहूर्तकिर्तीमहिते शुक्लेशसापै तिथौ ॥१॥ वापीकूपडागराजिरुचिरं रम्यं वनं वीतिकौ स्तभेः कुंभिगृहे नरेन्द्रसदनैरभ्रंलिहे मीहिते । श्रीमद्रायगिरौ गिरामविषये हीराजिना निर्मितो यावधन्द्रदिवाकरौ विलसतस्तावत्समुज्जृंभते ॥२॥ याचा थोडक्यात अर्थ पुढीलप्रमाणे -'सर्व जगाला आनंददायी असा हा जगदीश्र्वराचा प्रासाद श्रीमद्‌ छत्रपती शिवाजी राजा यांच्या आज्ञेने शके १५९६ मध्ये आनंदनाम संवत्सर चालू असताना सुमुहुर्तावर निर्माण केला. या रायगडावर हिरोजी नावाच्या शिल्पकाराने विहिरी, तळी, बागा, रस्ते, स्तंभ, गजशाळा, राजगृहे आशांची उभारणी केली आहे. ती चंद्रसूर्य असेतोवर खुशाल नांदो.'



१९. महाराजांची समाधी : मंदिराच्या पूर्वदरवाजापासून थोडा अंतरावर जो अष्टकोनी चौथरा दिसतो तीच महाराजांची समाधी. सभासद बखर म्हणते, ‘क्षत्रियकुलावतंस श्रीमन्महाराजाधिराज शिवाजी महाराज छत्रपती यांचा काल शके १६०२ चैत्र शुद्ध १५ या दिवशी रायगड येथे झाला. देहाचे सार्थक त्याणी बांधिलेला जगदीश्र्वराचा जो प्रासाद त्याच्या महाद्वाराच्या बाहेर दक्षणभागी केले. तेथे काळ्या दगडाच्या चिऱ्याचे जोते अष्टकोनी सुमारे छातीभर उंचीचे बांधिले असून वरून फरसबंदी केलेली आहे. फरसबंदीच्या खाली पोकळी आहे, तीत महाराजांचा अवशिष्टांश रक्षामिश्र मृत्तिकारुपाने सापडतो.’ दहनभूमी पलीकडे भग्न इमारतींच्या अवशेषांची एक रांग आहे, ते शिबंदीचे निवासस्थान असावे. त्याच्या पलीकडे सदर वस्तीपासून विलग असा एक घराचा चौथरा दिसतो. हे घर <u>इ.स. १६७४</u> मध्ये इंग्रज वकील हेन्री ऑक्झेंडन यास राहावयास दिले होते. महाराजांच्या समाधीच्या पूर्वेकडे भवानी टोक आहे तर उजवीकडे दारूची कोठारे, बारा टाकी दिसतात.

२०. कुशावर्त तलाव : होळीचा माळ डाव्या हातास सोडून उजवीकडील वाट कुशावर्त तलावाकडे जाते. तलावाजवळ महादेवाचे छोटेसे देऊळ दिसते. देवळासमोर फुटलेल्या अवस्थेत नंदी दिसतो.

२१. वाघदरवाजा : कुशावर्त तलावाजवळून घळीने उतरत वाघ दरवाजाकडे जाता येते. आज्ञापत्रात लिहिले आहे की, ‘किल्ल्यास एक दरवाजा थोर आयब आहे, यांकरीता गड पाहून एक दोन - तीन दरवाजे, तशाच चोरदिंडा करून ठेवाव्या. त्यामध्ये हमेशा राबत्यास पाहिजे तितक्या ठेवून वरकड दरवाजे व दिंडा चिणून टाकाव्या.’ हे दूरदर्शीपणाचे धोरण ठेऊनच महाराजांनी महादरवाजाशिवाय हा दरवाजा बांधून घेतला. या दरवाज्याने वर येणे जवळजवळ अशक्यच असले तरी दोर लावून खाली उतरू शकतो. पुढे राजाराम महाराज व त्यांची मंडळी झुल्फिरखानाचा वेढा फोडून याच दरवाज्याने निसटली होती.

२२. टकमक टोक : बाजारपेठेच्या समोरील टेपावरून खाली उतरुन टकमक टोकाकडे जाता येते. तेथेच एका दारूच्या कोठाराचे अवशेष दिसतात. जसजसे आपण टोकाकडे जातो तसतसा रस्ता निमुळता होत जातो. उजव्या हाताला सरळ तुटलेला २६०० फूट खोल कडा आहे. टोकावर वारा प्रचंड असतो व जागाही कमी असल्यामुळे गोंधळ न करता सावधानता बाळगावी

२३. हिरकणी टोक : गंगासागराच्या उजवीकडे पश्चिमेस जी चिंचोळी वाट जाते ती हिरकणी टोकाकडे जाते. हिरकणी टोकाशी संबंधित हिरकणी गवळणीची एक कथा सांगितली जाते. या बुरुजावर काही तोफाही ठेवलेल्या दिसतात. बुरुजावर उभे राहिले तर डाव्या हाताला गांधारीचे खोरे, उजव्या बाजूला काळ नदीचे खोरे दिसते. तसेच इथून पाचाड, खुबलढा बुरूज, मशीद मोर्चा ही ठिकाणे तोफेच्या माऱ्यात आहेत. त्यामुळे युद्धशास्त्राच्या तसेच लढाऊ दृष्टीने ही खूप महत्त्वाची आणि मोक्याची जागा आहे.

**बाल मित्रांनो, तुम्हाला साहस करायल आवडते ना! अंधार्या रात्री, घनदाट जंगलात तुम्हाला कोणी जायला सांगितले तर तुम्ही जाल? नाही ना? घाबरलात ना?   की जर जंगलात हिंस्त्र प्राणी आले तर! त्यांनी आपल्याला खाऊन टाकले तर?  आणि जर का भूत आले तर ??**

**बापरे !!! कल्पनाच सहन होत नाही ना.**

**ह्या मे महिन्या पासून तुमचा साठी एक नवी साहस कथा सुरु करीत आहोत ज्याचे नायक आहेत राजा विक्रमादित्य. अत्यंत पराक्रमी राजा. जो कोणालाही घाबरत नसे. हो हो अगदी भुताला देखील.**

**वेताळ पंचविशी हे पुस्तक महाकवी सोमनाथ भट्ट यांनी सुमारे २००० वर्षांपूर्वी लिहिले होते. ह्यात राजा विक्रमादित्य जंगलात जावून भुताला पकडून आणि खांद्यावर घेवून परत निघत असे. चालतांना ते अत्यंत हुशार भूत बुद्धिमान राजा विक्रमादित्याला छान छान गोष्टी   सांगत असे आणि गोष्टीचा शेवटी प्रश्न विचारी. मात्र एक अट असे. गोष्ट चालू असतांना राजाने बोलायचे नाही. राजा बोलला तर भूत परत उडून निघून जाईल. आणि प्रश्नाचे उत्तर माहिती असून देखील नाही सांगितले तर राजाचे डोके फुटून राजा मारून जाईल.**

**तर बघूया कोण जिंकतो राजा कि भूत.**

# गोष्ट पहिली (१):विक्रम आणि वेताळ यांची भेट

विक्रमादित्य नावाचा एक राजा होता.  गोदावरी नदी काठी त्याचे राज्य होते. राजा खूप साहसी आणि धाडशी होता. सगळ्या प्रजेचे आपल्या राजावर प्रेम होते. कारण राजा खूप प्रेमळ होता. सगळ्या लोकांची तो काळजी घेत असे. तो न्यायप्रिय होता आणि कोणावरही अन्याय होवू देत नसे.

एकेदिवशी राजा दरबारात बसलेला असतांना एक साधू आला. त्याने प्रसाद म्हणून राजाला एक फळ दिले. राजाने ते आपल्या खजीनदाराकडे ठेवायला दिले. त्यानंतर तो साधू रोज येवू लागला आणि राजाला फळ देवू लागला. राजाला कळेना साधू असे का करतोय. पण आदरामुळे त्याने साधूला ह्याचे कारण विचारले नाही.

एके दिवशी सकाळी बागेत फिरत असतांना राजा ला दिसले कि एक माकड राजवाड्याच्या भिंतीवर बसले आहे. राजाने नोकराकरवी साधूने दिलेले फळ मागविले आणि माकडाला खायला दिले जेंव्हा माकड फळ खावू लागला, तेव्हा त्यातून एक हिरा बाहेर पडला. राजाला आश्चर्य वाटले. त्याने ताबडतोब साधूने दिलेली सगळी फळे मागविली. फळे खराब झाली होती. पण जेंव्हा राजाने सगळी फळे कापायला सांगितली तेंव्हा प्रत्येक फळातून एक एक अमुल्य रत्न बाहेर पडू लागले. त्या दानशूर राजाने ती सर्व रत्ने  गरीब लोकांत वाटून टाकली . आता राजा उत्सुकतेने साधूची वाट पाहू लागला.

दुसर्याच दिवशी तो साधु नेहमी प्रमाणे अजून एका फळासह दरबारात उपस्थित झाला.

राजाने अत्यंत नम्रपणे विचारले "महाराज ! कृपया तुम्ही मला दिलेल्या इतक्या अमुल्य भेटींचे कारण सांगाल काय? कारण कुठल्याही कारणाशिवाय मी तुमच्याकडून कुठलीहि अमुल्य भेट स्वीकारू शकत नाही."

साधूने उत्तर दिले, " मला काही आध्यात्मिक उद्दीष्टप्राप्तीसाठी एका शूर माणसाची मदत हवी आहे. आपण मला मदत कराल काय?" विक्रम राजा तत्काळ मदत करायला तयार झाला. साधू पुढे म्हणाला, " हे राजा, येत्या अमावास्येला तू स्मशानभूमीत ये. स्मशानभूमी इथून २० किमी आहे. मी तेथे वडाचा झाडाखाली तुझी वाट पाहीन." विक्रम राजाने साधूचे म्हणणे कबुल केले.

ठरल्या अमावस्येचा रात्री, राजाने आपले डोके व शरीर काळ्या कपड्याने झाकले आणि गुपचूप ठरलेल्या ठिकाणी जंगलात पोहोचला. साधू राजाची वाटच बघत होता. तो राजाला म्हणाला, " राजा विक्रम ह्या जंगलाचा दक्षिण दिशेला चिंचेच्या वठलेल्या झाडावर एक प्रेत उलटे लटकत आहे. कृपया ते प्रेत तू मला आणून दे." राजा लगेचच साधूच्या इच्छेप्रमाणे निघाला आणि चिंचेचा झाडापाशी पोहोचला. तिथे तो झाडावर चढला आणि प्रेत काढून जमिनीवर टाकले. खाली येवून तो प्रेत उचलणार तोच ते प्रेत जोरजोरात मोठ्याने हसू लागले. राजाने ओळखले कि प्रेतामध्ये भूत आहे. तरीही निडरपणे राजा विक्रम ते प्रेत उचलून, खांद्यावर टाकून चालू लागला. परंतु काही वेळाने ते प्रेत खांद्यावरून उडाले व पुन्हा झाडावर जाऊन लटकू लागले. राजा विक्रम पुन्हा झाडाकडे गेला, झाडावर चढून प्रेत काढले आणि ते खांद्यावर टाकून चालू लागला. चालता चालता राजाने भुताला विचारले, "तू कोण आहेस?" " मी आहे वेताळ!" भूताने उत्तर दिले आणि राजाला विचारले, " तू कोण आहेस ? आणि मला कोठे व का घेऊन चालला आहेस?

विक्रमाने उत्तर दिले " मी राजा  विक्रम आहे. आणि एका साधूचा सांगण्यावरून तुला घेवून जात आहे."

वेताळाने राजाबरोबर जाण्यास काही हरकत घेतली नाही पण एक अट टाकली. " हे राजा, आपल्याला अजून खूप दूर जायचे आहे, तुला चालायचे आहे. तू थकून जाशील, तुला थकवा जाणवू नये आणि तुझा थकवा दूर व्हावा, म्हणून मी तुला एक गोष्ट  सांगतो. पण एक अट आहे. ती अशी कि गोष्ट पर्ण होईपर्यंत तू एकही शब्द बोलायचा नाही. तू जर बोललास तर मी परत माझ्या झाडावर उडून निघून जाईन. कबुल आहे ?

"कबूल आहे!" राजा म्हणाला आणि लक्ष देवून वेताळाची गोष्ट ऐकू लागला.

.................................क्रमशः

# गौतम बुद्धांची कहाणी - डॉ. सौ. पल्लवी प्रसाद बारटके



**"जे महान अथवा नित्य वाटते त्यालादेखील अंत आहे. जिथे संयोग तिथे विनाश, जिथे जन्म तिथे मृत्यू आहे."**

**अशा सत्य आणि चिरंजीव विचारांना प्रमाण मानून महात्मा गौतम बुद्धांनी स्थापन केलेला 'बौद्ध धर्म' हा जगातील प्रमुख धर्मांपैकी एक आहे.**

**भगवान गौतम बुद्ध म्हणजे राजपुत्र सिद्धार्थ यांचा जन्म कपिलवस्तू जवळील लुम्बिनी येथे इसविसनपूर्व ५६३ मध्ये झाला. शाक्य राजा शुध्धोधन हे त्यांचे पिता तर देवदहची राजकुमारी महामाया हि त्यांची माता होत.**

**लहानपणापासून सिद्धार्थ एकांतप्रिय, दयाळू होते. जगातील सर्व ऐहिक सुखे त्यांच्या पायाशी लोळण घेत असूनही ते नेहमी अस्वस्थ राहत असत, विचारमग्न दिसत असत. त्यांच्या ह्या वृत्तीमुळे त्यांचे वडील राजा शुध्धोधन चिंतीत बनले**

होते. मुलाला ह्या सर्वातून बाहेर काढण्याचा उपाय म्हणून त्यांनी वयाच्या १६ व्या वर्षी सिद्धार्थ यांचा विवाह राजकुमारी यशोधरेबरोबर लावून दिला. काहीवर्षांनी राजपुत्र राहुलचा जन्म झाला. संपूर्ण राज्यात आनंदोत्सव साजरा केला जात असतांना सिद्धार्थ मात्र उदास होते. ते म्हणाले, "आज माझ्या जीवनशृंखलेत जीवन शृंखलेत एक नवी कडी जोडली गेली आहे." समस्त सुखे प्राप्त असतांनाही ते मानसिकरीत्या असमाधानी होते.

राजप्रसादातील बगीच्या मधून फेरफटका मारत असतांना त्यांना दिसलेल्या दृश्यांमुळे आजार, मृत्यू, वार्धक्य यामुळे  माणसाला अगतिक बनविणारे दुखः हा त्यांचा चिंतनाचा विषय बनला. एका क्षणात त्यांनी सर्व सुखाचा, प्रियजनांचा, त्याग केला व न्याय प्राप्तीच्या शोधात ते बाहेर पडले.





निरंजना नदीच्या काठी 'उरवले' वनात त्यांची ५ तपस्वी ब्राह्मणांशी भेट झाली. अन्न पाणी, सुख निद्रा यांचा त्याग करून गौतम बुद्धांनी त्यांच्या बरोबर कठोर तपश्चर्या केली. पण त्यातून काही साध्य झाले नाही. अशाने निराश होवून त्यांनी गया गाठले. तेथील बोधीवृक्षाखाली समाधिस्थ बसून त्यांनी प्रतिज्ञा  केली की जो पर्यंत मला ज्ञानप्राप्ती होणार नाही, तो पर्यंत मी येथून हलणार नाही. सात दिवस समाधिस्थ राहिल्यानंतर ८ व्या दिवशी वैशाख पौर्णिमेला त्यांना सत्यज्ञानप्राप्ती झाली. तेंव्हा पासून त्या जागेस 'बोधगया' हे नाव प्राप्त झाले. ज्ञानप्राप्ती

झाल्यानंतर महात्मा गौतम बुद्धांनी सारनाथ येथे आपल्या पूर्वीच्या ५ ब्राह्मण मित्रांना उपदेश केला. ह्या त्यांच्या प्रथम पाच शिष्यांना " पंचवर्गीय" म्हंटले जाते. त्यांच्या शिष्यांनी त्यांच्या उपदेशांचे पाली भाषेत त्रिपिटकांमध्ये संकलन केले आहे. "विनयपिटक" "सुत्तपिटक" आणि "अभिधम्मपिटक". ह्या त्या त्रिपिटका आहेत. बौद्ध धर्मात या त्रिपिटकांना वेद-उप निषदांइतके महत्व आहे. "अहिंसा" हे बौद्ध धर्माचे प्रमुख तत्व आहे. गौतमबुद्ध म्हणत,"मी जसा तसेच ते अन ते जसे तसाच मी ...म्हणूनच आपल्या सारख्यांना कधी मारू नका अन मारण्या साठी कुणाला प्रेरीतही करू नका."

सम्राट अशोकाने बौद्ध धर्माचा प्रसार सर्वाधिक व सर्वदूर केला. कलिंगच्या महायुद्धातील नरसंहारामुळे सम्राट अशोक व्यथित झाले आणि त्यांचे हृदय परिवर्तन झाले. त्यांनी महात्मा बुद्धांचे उपदेश प्रमाण मानून लोक-लोकांपर्यंत पोहोचवले.

महात्मा गौतम बुद्ध बौद्ध धर्माच्या प्रसारासाठी गावोगाव फिरत असत.लोकांना अहिंसेची शिकवण देत असत.अश्यातच इ. स.पूर्व ४८३ मध्ये त्यांनी ' महानिर्वाण ' घेतले. बौद्ध धर्माचा उद्‌गाता पौर्णिमेस जन्माला आला,त्याला दिव्य ज्ञानही प्राप्त झाले आणि त्याने निर्वाण प्रवेश केला तोही एका पौर्णिमेसच

अश्या ह्या पौर्णिमा पुरुषोत्तम महात्मा गौतम बुद्धांचे विचार जगभरात लोकांना मार्गदर्शक ठरत आहेत

### महात्मा गौतम बुद्धांचा सुविचार

"आपण आज जे आहोत ते आपण आज पर्यंत कसे वागत आलो त्याचे प्रतित आहे.जर कोणी वाईट वागत असेल तर त्याला आयुष्यभर कष्टच झेलावे लागतात आणि जर कोणी चांगले कर्म करत असेल तर आनंदी जीवन सावली प्रमाणे आयुष्यभर त्याच्या सोबत राहते.



हस्त कला : अलिशा कुरिया, वय : ८ वर्ष



# कोकणचा मेवा-बहुगुणी कोकम

रणरणत्या उन्हातून घरात आल्यावर आपल्या समोर रसना, पेप्सी, कोकाकोला याच सोबत लिंबू सरबत, कोकम ,कैरी पन्ह अशा प्रकारची पेये असतील तर आपण कोणाकडे आकर्षित होऊ. नक्कीच आपली पारंपारिक पेये..

आजच्या instant युगात या पारंपारिक गोष्टी हद्दपार झाल्या आहेत. म्हणूनच या बहुगुणी पदार्थांबद्दल थोडें जाणून घेउ या.

आपल्या देशाची किंबहुना महाराष्ट्राची खाद्य संस्कृती पारंपारिक आणि मोठी आहे. यात आरोग्यपूर्ण घटक भरपूर प्रमाणात आहेत .त्यातही बदलत्या ऋतूनुसार उपलब्ध गोष्टींचा आपण भरपूर उपयोग करत असतो. म्हणूनच उन्हाळा आला की आपल्याला थंडगार कोकम सरबताची आठवण येते. आपल्या सगळ्यांच्या स्वयंपाक घरात कोकम असतोच.गतीफेरी (Guttiferae) कुळातील या झाडाचे शास्त्रीय नाव आहे. गार्सिनिया इंडिका (Garcinia Indica). पोर्तुगीज वैद्य गार्सिया द ओर्ता याच्या नावावरून हे नाव आले आहे.

या झाडाचे मुळ स्थान कोकण, गोवा, कारवार, मलबार हे आहे.तसेच केरळ, अंदमान निकोबार, ओरिसा आणि पूर्वेकडील काही भागात हे झाड आढळते.

या झाडाचे खोड साधारण ८ ते १० मीटर सरळ उंच वाढते.हिरव्यागर्द पानांनी बहरलेल्या फांद्या खाली झुकल्या सारख्या वाटतात. याची पाने समोरासमोर लंबगोल आकाराची असून छोटी असताना चक्क लाल रंगाची असतात. साधारण नोव्हेंबर ते फेब्रुवारी या काळात झाडाला लालसर गुलाबी रंगाची फुले येतात. पुढे यातूनच फळे आपण कोकम किंवा रातांबे म्हणून ओळखतो.

ही फळे चार फोडींची असतात. त्यात ६ ते ८ बिया असतात. एप्रिल मे मध्ये ही फळे पिकतात. या फळाचे अनेक फायदे आहेत. त्यातला मुख्य म्हणजे 'पित्तशामक'.या फळाच्या नैसर्गिक रंगाला आपण आमसुली रंग म्हणतो. पिकलेल्या फळाच्या सालींना आमसूल म्हणतात.आमटी,भाजी,माशाचा कालवण यात ही वापरतात. पिकलेल्या कोकामाचा गर कुस्करून निघालेल्या रसात याच्या साली बुडवून सुकवल्या जातात.ही क्रिया ३/४ वेळा करून मग साली सावलीत सुकवतात.आमसुलं बनवताना जो गर, रस निघतो त्यापासून आगळ हे सिरप बनवतात. सोलकढी बनवण्यासाठी ते वापरतात.तसेच साखर घालून सरबत बनवतात. हे सरबत प्यायल्याने पित्त तर कमी होतच, पण पित्ताने अंगावर उठलेल्या गांधींवर कोकमाचे पाणी लावल्याने अंगाचा दाह कमी होऊन आराम पडतो. कोकमाच्या बियांपासून तेल काढतात. यासाठी बियांना राख चोळून त्या उन्हात वाळवतात. बी चे कडक आवरण फोडून आतील मगजातून जवळ जवळ ४५% तेल निघते. प्रक्रिया नकेलेल्या तेलाचे अंडाकृती गोळे बाजारात मिळतात. तसेच प्रक्रिया करून हे तेल खाद्य पदार्थांमध्ये वापरतात. लिपस्टिक,क्रीम्स यामध्येही वापरले जाते. पायाच्या टाचाना पडणाऱ्या भेगा, मुळव्याध यावर तर रामबाण औषध म्हणून आयुर्वेदात कोकम तेल वापरले जाते. सायट्रिक,असेटिक, मेलिक, एस्कॉर्बिक, हायड्रो सायट्रिक याप्रकारची आम्लं यात असतात. बी कॉम्प्लेक्स, क जीवनसत्व तसेच म्यग्नेशिअम सारखी खनिजेही असतात. हे सर्व घटक आपल्या शरीराला या न त्या प्रकारे मदतच करतात. या फळात कोलेस्ट्रोल अजिबात नसल्याने हृदयासाठी उत्तम.कोकम सरबत नियमित प्यायल्याने पित्त, अपचन, उष्माघात यांचा त्रास तर कमी होतोच पण रक्तदाबावर नियंत्रण राहून हृदयविकाराचा धोकाही टाळता येतो.

वडिलांच्या नोकरीच्या बदलीच्या निमित्ताने जवळ जवळ ७/८ वर्षे दापोली, रत्नागिरी यासारख्या अस्सल कोकणी शहरांमध्ये राहण्याचा योग आला. आणि

